**पोलीस महासंचालक, म.रा., यांच्या अधिपत्याखालील पोलीस आयुक्त व पोलीस अधीक्षक यांची कार्यालये आणि इतर कार्यालये यांच्या आस्थापनांवरील मानसेवी बालरोगतज्ञ यांची ४८ पदे आणि इतर वेगवेगळ्या संवर्गातील २० पदे, अशा एकूण ६८ अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०२२ पासून दिनांक ३१.०८.२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- पोरुग्णा-०१२१/प्र.क्र.६०/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- १५ मार्च, २०२२.

**वाचा** :-

१) शासन निर्णय, गृह विभाग, क्र. संकीर्ण ०३१६/प्र.क्र.१९८/पोल-७, दिनांक ३०.०९.२०१६

२) शासन निर्णय, गृह विभाग, क्र.पोरुग्णा-०१२१/प्र.क्र.६०/पोल-७, दिनांक २७.०८.२०२१.

३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ. पु.क., दिनांक २२.०२.२०२२.

४) पोलीस महासंचालक, म.रा. यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोमसं/ २६-ब/मुदतवाढ/ पोल-७/ १४/ २०१२, दिनांक १९.०१.२०२२.

**प्रस्तावना-**

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांच्या अधिपत्याखालील पोलीस आयुक्त व पोलीस अधीक्षक यांची कार्यालये आणि इतर कार्यालये यांच्या आस्थापनांवरील मानसेवी बालरोगतज्ञ यांची ४८ पदे आणि इतर वेगवेगळ्या संवर्गातील २० पदे, अशी एकूण ६८ अस्थायी पदे (शासन निर्णय, गृह विभाग, क्र.संकीर्ण ०३१६/प्र.क्र.१९८/पोल-७, दिनांक ३०.०९.२०१६, यामध्ये विनिर्दिष्ट केलेली) यांची मुदत, शासन निर्णय, गृह विभाग, क्र. पोरुग्णा-०१२१/प्र.क्र.६०/पोल-७, दिनांक २७.०८.२०२१ द्वारे, दिनांक ०१.०९.२०२१ पासून ते दिनांक २८.०२.२०२२ पर्यंत वाढविण्यात आली होती. आता उक्त पदांना त्यापुढील मुदतवाढ मिळणेबाबत पोलीस महासंचालक, म.रा., यांच्या कार्यालयाच्या संदर्भाधीन पत्राद्वारे विनंती करण्यात आली आहे.

**२.** शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक २२.०२.२०२२, द्वारे "सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व

अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०२२ ते दिनांक ३१.०८.२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार” देण्यात आले आहेत. त्या अनुसार शासनाने पुढील निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय-**

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, यांच्या अधिपत्याखालील पोलीस आयुक्त व पोलीस अधीक्षक यांची कार्यालये आणि इतर कार्यालये यांच्या आस्थापनांवरील मानसेवी बालरोगतज्ञ यांची ४८ पदे आणि इतर वेगवेगळ्या संवर्गातील २० पदे, अशा एकूण ६८ अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०२२ पासून ते दिनांक ३१.०८.२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्यास, पुढील अटींवर, याद्वारे, मान्यता देण्यात येत आहे:-

**अटी-**

१) सहा महिन्यांपेक्षा अधिक कालावधीसाठी रिक्त असलेल्या पदांना ही मुदतवाढ लागू राहणार नाही.
२) उक्त ६८ पदे ज्या अटी व शर्ती यांच्या अधीन मंजूर करण्यात आली आहेत, त्या अटी व शर्ती यांचे काटेकोरपणे अनुपालन करण्यात यावे.
३) पोलीस महासंचालक, म.रा. यांनी सर्व पदांचा आढ़ावा घेऊन सुधारित आकृतीबंध शासनाच्या मान्यतेसाठी तात्काळ सादर करावा. यानंतर आकृतिबंध निश्चित करण्याकरिता उक्त पदांची मुदत वाढवून मिळणार नाही, याची नोंद घावी.

**२.** उक्त ६८ पदांचे वेतन व भत्ते यावरील खर्च हा सन २०२१-२२ आणि सन २०२२-२३ या वित्तीय वर्षांकरिता संबंधित लेखाशीर्षांखाली मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागवण्यात यावा.

**३.** हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०३१५१७४२१५२६२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NARAYAN BIRA MANE

Digitally signed by NARAYAN BIRA MANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ï¿½HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1dfb457576797050f19aafaa495673fc843c789942459cd39fc5561071b4a70c, pseudonym=D53E4970DA18F4240576F3F34F92F7E069E6A52A, serialNumber=79C09BA352C5B3E65B259113F1CDCFAB29FB961D4EA9A24411D7F622D2ED20BF, cn=NARAYAN BIRA MANE
Date: 2022.03.15 17:44:44 +05'30'

**( नारायण माने )**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग.

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा.मुख्य मंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

३) मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/ विधानपरिषद, यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
४) मा.गृह राज्यमंत्री (शहरे/ ग्रामीण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
७) संचालक, आरोग्य सेवा, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

**प्रत-**

१) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
५) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा )-२, महाराष्ट्र, नागपूर.
७) कार्यासन अधिकारी, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) कार्यासन अधिकारी, सार्वजनिक आरोग्य विभाग, नवीन मंत्रालय, नवीन गो.ते. रुग्णालय इमारत, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई.
९) निवड फाईल (पोल-७).